Community Action for Health अंतर्गत राज्य सुकाणू समितीची पुर्नरचना करणे व राज्य संसाधन गटाची स्थापना करणे..

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-११२१/प्र.क्र.१०५/२१/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०१ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राग्राअ१००७/प्र.क्र.१७२/आरोग्य -७, दिनांक २४.०८.२००७.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राग्राअ/२०११/प्र.क्र.२३/आरोग्य -७ अ, दिनांक ३१ मार्च, २०११.
३) राज्य सुकाणू समिती सभेमध्ये झालेला निर्णय, दिनांक ०८.०७.२०२१.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार Community Action for Health या कार्यक्रमांतर्गत दिनांक २४.०८.२००७ च्या शासन निर्णयान्वये राज्य स्तरावर राज्य सुकाणू समिती स्थापन करण्यात आली होती. तसेच दिनांक ३१.०३.२०११ च्या शासन निर्णयान्वये सदर समितीची पुनर्रचना करण्यात आली होती. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षापासून आरोग्य सेवांवर लोकाधारित देखरेख व नियोजन या कार्यक्रमाचे केंद्र शासनाच्या मान्यतेने Community Action for Health या कार्यक्रमात रुपांतर करण्यात आले आहे. Community Action for Health या कार्यक्रमाची अमंलबजावणी करणेसाठी कालानुरुप बदल करणे आवश्यक आहे. त्यानुसार दिनांक ३१.०३.२०११ च्या शासन निर्णयामध्ये व सद्यस्थितीत कार्यरत पदनामामध्ये बदल करणे आवश्यक आहे. तसेच दिनांक ०८.०७.२०२१ च्या सुकाणू समिती सभेमध्ये झालेल्या चर्चेनुसार समितीची पुनर्रचना करण्यासाठी मान्यता देण्यात आली आहे. तसेच राज्य सुकाणू समितीमध्ये नव्याने समावेश करण्यात येणाऱ्या अशासकीय सदस्यांची नावे ठरविण्यात आली आहेत. त्यानुषंगाने शासन स्तरावर शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सुकाणू समितीची पुनर्रचना खालील प्रमाणे राहील.:-

| अ.क्र. | पदनाम व विभाग | नियुक्ती |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई | **अध्यक्ष** |
| २ | अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | आयुक्त (आरोग्य सेवा ) व अभियान संचालक, राआअ, मुंबई | सदस्य |
| ६ | संचालक (१) , आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई | सदस्य |
| ७ | संचालक (२), आरोग्य सेवा, पुणे | सदस्य |
| ८ | कार्यकारी संचालक, राज्य आरोग्य यंत्रणा संसाधन केंद्र, पुणे | सदस्य |
| ९ | डॉ. अभय शुक्ला, प्रतिनिधी भारत सरकारच्या ॲडवायझरी ग्रुप फॉर कम्युनिटी ॲक्शन मेंबर (ए.जी.सी.ए), दिल्ली | सदस्य |
| १० | डॉ. अभिजीत दास, प्रतिनिधी भारत सरकारच्या ॲडवायझरी ग्रुप फॉर कम्युनिटी ॲक्शन मेंबर (ए.जी.सी.ए), दिल्ली | सदस्य |
| ११ | डॉ. अतुल रायकर, सल्लागार, एनएचएसआरसी, दिल्ली | सदस्य |
| १२ | डॉ. ब्रेनेल डिसूझा, प्रतिनिधी, टाटा इन्स्टिटयुट ऑफ सोशल सायन्स, मुंबई | सदस्य |
| १३ | श्री. भीम रास्कर, प्रतिनिधी, महिला राजसत्ता आंदोलन, मुंबई | सदस्य |
| १४ | श्रीमती. मुमताज शेख, प्रतिनिधी, CORO, India, मुंबई | सदस्य |
| १५ | डॉ. कामाक्षी भाटे,रिटायर्ड प्राध्यापिका, केईएम हॉस्पिटल,मुंबई | सदस्य |
| १६ | डॉ. अशोक बेलखोडे, भारत जोडो यूवा अकॅडमी, किनवट, नांदेड | सदस्य |
| १७ | डॉ. छाबरा एस. इमेरिटयूएस, प्राचार्य, महात्मा गांधी इनस्टियूट ऑफ मेडिकल सायन्स,सेवाग्राम, वर्धा | सदस्य |
| १८ | Community Action for health या कार्यक्रमांतर्गत कार्यरत राज्य नोडल संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| १९ | राज्य नोडल संस्था प्रतिनिधी | सदस्य |
| २० | राज्य नोडल संस्थेअंतर्गत कार्यरत जिल्हा नोडल संस्थेचे दोन प्रतिनिधी<br>• **साथी राज्य नोडल संस्था प्रतिनिधी**<br>i) डॉ. शशिकांत अहंकारी, प्रतिनिधी जिल्हा नोडल संस्था, हॅलो फाऊंडेशन,उस्मानाबाद<br>ii) साथी राज्य नोडल संस्था यांनी प्रत्येक बैठकीसाठी एक जिल्हा नोडल संस्था प्रतिनिधी - रोटेशन पध्दतीने प्रकल्पातील सर्व जिल्हा नोडल संस्थाना संधी क्रमश: उपलब्ध करुन दयावी.<br>• **स्टापी राज्य नोडल संस्था प्रतिनिधी**<br>I) श्रीमती. शुभदा देशमुख,प्रतिनिधी जिल्हा नोडल संस्था, आम्ही आमच्या आरोग्यासाठी, गडचिरोली<br>II) स्टापी राज्य नोडल संस्था यांनी प्रत्येक बैठकीसाठी एक जिल्हा | सदस्य |

| अ.क्र. | पदनाम व विभाग | नियुक्ती |
|---|---|---|
| | नोडल संस्था प्रतिनिधी - रोटेशन पध्दतीने प्रकल्पातील सर्व जिल्हा नोडल संस्थाना संधी क्रमश: उपलब्ध करुन दयावी. | |
| २१ | सहसंचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | **सदस्य सचिव** |

## २. राज्य सुकाणू समितीच्या भुमिका व जबाबदा-या :-

Community Action For Health या योजनेच्या परिणामकारक अमंलबजावणीसाठी राज्य सुकाणू समिती स्थापन करण्यात आली आहे. राज्य सुकाणू समितीमध्ये शासकिय अधिकारी, ए.जी.सी.ए. व एनएचएसआरसी दिल्लीचे प्रतिनिधी, इतर अशासकिय सदस्य व राज्य व जिल्हा नोडल संस्थेचे प्रतिनिधी यांचा या समितीमध्ये समावेश करण्यात आला आहे. या सर्व सदस्यांच्या माध्यमातून Community Action For Health या योजनेची अमंलबजावणी करतांना आवश्यक धोरणात्मक निर्णय घेणे अपेक्षित आहे. त्यासाठी राज्य सुकाणू समितीच्या भुमिका व जबाबदा-या खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

१. राज्य सुकाणू समितीने Community Action For Health या योजनेच्या यशस्वी अमंलबजावणीसाठी आवश्यक परिपत्रके, शासन निर्णय निर्गमित होणेसाठी मार्गदर्शन करणे, विविध शासकिय विभागांशी समन्वय साधणे यासाठी पुढाकार घ्यावा.
२. Community Action For Health या योजनेच्या माध्यमातून विविध नाविन्यपूर्ण राबवावयाच्या उपक्रमांची यादी तयार करणे व अंतिम मान्यता देण्यात आलेल्या उपक्रमांचा प्रस्तावित प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये समावेश करावा.
३. प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये मान्यता प्राप्त उपक्रमांच्या अमंलबजावणीसाठी आवश्यक निधीची उपलब्धता, निधीचे वितरण, निधी खर्च, याबाबत राज्य नोडल संस्था स्तरावर मुल्यमापन करुन समिती समोर मांडणी करणे, समितीने मंजूर प्रकल्प, अंमलबजावणी आराखडयानुसार कार्यवाही झाली आहे का, याची तपासणी करावी.
४. Community Action For Health या योजनेतंर्गत सामाजिक जनजागृतीसाठी राबविण्यात येणा-या विविध उपक्रमांसाठी आवश्यक प्रशिक्षण साहित्य तयार करणेसाठी राज्य नोडल संस्थाना तांत्रिक मदत व मार्गदर्शन करावे.
५. Community Action For Health या योजनेची अमंलबजावणी करतांना स्थानिक पातळीवरून, शासकिय स्तरावरुन, शासनाच्या इतर विभांगाकडून काही तांत्रिक व अतांत्रिक अडचणी येत असल्यास समिती समोर मांडून आवश्यक निर्णय घ्यावे.

६. राष्ट्रीय आरोग्य अभियानातंर्गत Community Action For Health या योजनेव्यतिरिक्त गावपातळीवर आशा / व्हीएचएनएससी समिती / व्हीएचएनडी या योजनांच्या अमंलबजावणीत अडचणी येत असल्यास या बाबींवर राज्य सुकाणु समितीने मार्गदर्शन करावे.

७. राज्य सुकाणू समितीच्या त्रैमासिक सभांमध्ये Community Action For Health योजनेतंर्गत मागील ३ महिन्यात राबविण्यात आलेल्या विविध कार्यक्रमांचे तपशिल, आलेल्या अडचणी, अडचणी सोडविण्यासाठी करण्यात आलेली कार्यवाही व आवश्यकता असल्यास करावयाची कार्यवाही, आदर्श व नाविन्यपूर्ण घटनांची माहिती समिती समोर मांडून, उपक्रम राबवितांना आलेल्या अडचणींवर चर्चा करून समितीने आवश्यक गरजांना मान्यता द्यावी.

८. Community Action For Health या योजनेच्या माध्यमातून राबविण्यात आलेल्या विविध उपक्रमांमधून स्थानिक पातळीवर आदर्श व इतरांपेक्षा वेगळया ठरलेल्या उपक्रमांची यादी Success Stories म्हणून समितीसमोर मांडून, सदर यशस्वी उपक्रमांची व्याप्ती इतर भागांमध्ये पोहोचविण्यासाठी समितीने निर्णय घ्यावा.

९. राज्य सुकाणू समितीमध्ये ग्राम विकास विभाग व महिला व बालविकास विभाग या विभागांच्या प्रतिनिधींचा समावेश करण्यात आला आहे, या विभागांशी संलग्न विविध समित्या गावपातळीवर कार्यरत असून या समित्यांचे आवश्यक असल्यास एकत्रिकरण करावे किंवा स्थानिक पातळीवर काही उपक्रमांच्या एकत्रित अमंलबजावणी करण्यासाठी निर्णय घ्यावा.

१०.Community Action For Health या योजनेच्या माध्यमातून स्थानिक पातळीवर आरोग्य विभागाअतंर्गत राबविण्यात येणा-या विविध योजनांची सुस्पष्ट माहिती जनतेपर्यंत पोहचविण्यासाठी Community Action For Health या योजनेची कार्यक्षमता वाढविण्यावर भर देणा-या उपाययोजनांवर चर्चा करुन आवश्यक निर्णय घ्यावा.

११.राज्य सुकाणू समितीमध्ये विविध भागांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या अशासकिय सदस्यांचा सहभाग घेण्यात आला आहे. या अशासकीय सदस्यांनी स्थानिक पातळींवर येणा-या अडचणी व त्यावर आवश्यक उपाययोजना समितीसमोर मांडून, समितीने अशासकिय सदस्यांच्या माध्यमातून सुचविण्यात आलेल्या उपाययोजनावर चर्चा करुन त्यावर योग्य ते निर्णय घ्यावे.

१२.राज्य सुकाणू समिती व समितीमधील अशासकिय सदस्य यांच्या माध्यमातून या योजनेचे वार्षिक मूल्यमापन होणे आवश्यक आहे. या मूल्यमापनाच्या अहवालानुसार काही धोरणात्मक बाबींवर कार्यवाही करणे, तसेच काही मुद्दे राज्य देखरेख व नियोजन समिती पुढे मांडण्याची कार्यवाही करावी.

१३.Community Action For Health या योजनेची अमंलबजावणी करतांना राज्य सुकाणु समितीने वेगवान पध्दतीने निर्णय घेण्याची यंत्रणा (Rapid Decision Making Mechanism) विकसित करावी, याबाबत समितीने वेळोवेळी लक्ष पुरविणे आवश्यक आहे.

## ३. राज्य संसाधन गट (State Resource Group) :-

राज्य सुकाणू समितीचे (SMC) कार्य अधिक प्रभावीपणे होण्याच्या दृष्टिने समितीतील अशासकीय सदस्यांचा गट तयार करणेसाठी दि. ६ जुलै २०२० रोजी झालेल्या राज्य सुकाणू समिती सभेमध्ये मान्यता देण्यात आली असून **राज्य संसाधन गटाची** रचना खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम व विभाग | नियुक्ती |
|---|---|---|
| १ | कार्यकारी संचालक, राज्य आरोग्य यंत्रणा संसाधन केंद्र, पुणे | **अध्यक्ष** |
| २ | डॉ. अभय शुक्ला, प्रतिनिधी भारत सरकारच्या ॲडवायझरी ग्रुप फॉर कम्युनिटी ॲक्शान मेंबर (ए.जी.सी.ए), दिल्ली | सदस्य |
| ३ | डॉ. अभिजीत दास, प्रतिनिधी भारत सरकारच्या ॲडवायझरी ग्रुप फॉर कम्युनिटी ॲक्शान मेंबर (ए.जी.सी.ए), दिल्ली | सदस्य |
| ४ | डॉ. अतुल रायकर, सल्लागार, एनएचएसआरसी, दिल्ली | सदस्य |
| ५ | डॉ. ब्रेनेल डिसूझा, प्रतिनिधी टाटा इन्स्टिटयुट ऑफ सोशल सायन्स, मुंबई | सदस्य |
| ६ | श्री. भीम रासकर, प्रतिनिधी, महिला राजसत्ता आंदोलन, मुंबई | सदस्य |
| ७ | डॉ. कामाक्षी भाटे,रिटायर्ड प्राध्यापिका, केईएम हॉस्पिटल,मुंबई | सदस्य |
| ८ | श्रीमती. मुमताज शेख,CORO, India, मुंबई | सदस्य |
| ९ | डॉ. अशोक बेलखोडे, भारत जोडो यूवा अकॅडमी, किनवट, नांदेड | सदस्य |
| १० | डॉ. छाबरा एस. इमेरिटयूएस, प्राचार्य, महात्मा गांधी इनस्टियूट ऑफ मेडिकल सायन्स,सेवाग्राम, वर्धा | सदस्य |
| ११ | Community Action for health या कार्यक्रमांतर्गत कार्यरत राज्य नोडल संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| १२ | राज्य नोडल संस्था प्रतिनिधी (प्रती संस्था २ प्रतिनिधी ) | सदस्य |
| १३ | सहसंचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | **सदस्य सचिव** |

## ४. राज्य संसाधन गटाच्या भुमिका व जबाबदा-या :-

राज्य संसाधन गट हा राज्य सुकाणू समितीला संलग्न राहून काम पाहणार आहे. राज्य सुकाणू समिती अंतर्गत Community action for health या योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्य सुकाणू समितीमधील अशासकीय सदस्यांचा हा गट CAH प्रक्रियेसाठी Think tank म्हणून काम करील. या गटाच्या माध्यमातून CAH प्रक्रिये अंतर्गत गावपातळीपासून जिल्हा स्तरावर येणारे प्रश्न, विषय, चर्चा या राज्य सुकाणू समितीसमोर प्रगल्भपणे मांडणे शक्य होणार आहे. राज्य संसाधन गटाच्या भुमिका व जबाबदा-या पुढीलप्रमाणे असतील.

१. राज्य संसाधन गटाच्या बैठका प्रत्येक २ महिन्यातून एकदा घेणे आवश्यक आहे. आवश्यकता भासल्यास यापेक्षाही अधिक सभा देखील घेता येऊ शकतील.

२. राज्य संसाधन गटाच्या सदस्यांना जिल्हा वाटप करण्यात येईल व त्यांना त्या जिल्हयांचे CAH या योजनेचे नोडल अधिकारी म्हणून काम पाहणे आवश्यक आहे.

३. राज्य सुकाणू समिती सभेत अशासकीय सदस्यांनी त्यांना नेमुन देण्यात आलेल्या जिल्हयांमध्ये नियमित भेटी दरम्यान Community Action For Health या योजनेची अमंलबजावणी करतांना जिल्हास्तरावर येणा-या अडचणी सोडविण्यासाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे. तसेच यशस्वीपणे राबविण्यात आलेल्या कार्यक्रमांची मांडणी करणे व उपक्रम राबवितांना करावयाच्या आवश्यक उपाययोजना समितीसमोर मंजूरीसाठी मांडावे.

४. राज्य संसाधन गट हा खालील पाच घटकांवर कार्य करेल.

- प्रशिक्षण व अमंलबजावणी (Training and hand holding)
- यशस्वी व सकारात्मक बाबी मांडणे (Bank of Best practises)
- उपायांची देवाणघेवाण करणे (Solution Exchange)
- माहितीचे व्यवस्थापन करणे (Knowledge Management)
- योजनेचे नेटवर्किग वाढविणे व इतर योजनांसोबत काम करणे (Networking and develop Alliance Building)

५. राज्य संसाधन गटाच्या अशासकीय सदस्यांनी राज्य नोडल संस्थाना नियमित मार्गदर्शन करावे.

६. राज्य संसाधन गटाच्या अशासकीय सदस्यांनी स्थानिक पातळीवर काम करणा-या स्वंयसेवी संस्था, एनजीओ तालुका समन्वयक, ग्राम आरोग्य दूत यांच्या संपर्कात राहून त्यांना वेळोवेळी मार्गदर्शन करावे. स्थानिक पातळीवरील न सुटलेले मुद्दे जिल्हास्तरीय अधिकाऱ्यांसमोर मांडावे व जिल्हास्तरावर न सुटलेले मुद्दे राज्य सुकाणु समितीसमोर मांडावे.

७. Community Action For Health या योजनेची अमंलबजावणी करतांना जिल्हा/तालुका व गाव पातळीवर राबविण्यात येणा-या उपक्रमांची निवड भौगोलिक परिस्थितीनुसार करावी.

८. राज्य संसाधन गटाच्या अशासकीय सदस्यांनी CAH कार्यक्रमाचे अहवाल नियमित तपासणी करणे आवश्यक आहे. आवश्यकता असल्यास जिल्हा स्वयंसेवी संस्था तसेच इतर संबंधित कर्मचारी यांना मार्गदर्शन करण्यात यावे.

९. राज्य संसाधन गटाच्या अशासकीय सदस्यांनी CAH कार्यक्रमाचे वर्षभरात राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमाचे महिनानिहाय कॅलेंडर तयार करुन त्यानुसार अमंलबजावणी होत आहे किंवा नाही ? याची तपासणी करावी.

१०. राज्य संसाधन गटाने CAH च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी जास्तीत जास्त सुचना द्याव्यात. तसेच योजनेची कार्यक्षमता वाढविण्यासाठी जिल्हा स्वयंसेवी संस्था या कार्यक्रमाची रुपरेषा तयार करुन अंमलबजावणी करतील. तसेच योजनेच्या अमंलबजावणी मध्ये कल्पकता आणतील.

११. जे अशासकीय सदस्य समितीच्या कामासाठी पुरेसा वेळ देऊ शकत नसतील, ज्यांच्या माध्यमातून योजनेचे मुल्यमापन होत नसेल अशा सदस्यांना अकार्यक्षम सदस्य म्हणून त्यांचे समितीचे सदस्यत्व संपृष्टात आणण्यात येईल.

१२. अशासकीय सदस्यांनी जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, इतर शासकीय विभागातील विभाग प्रमुख, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा शल्य चिकीत्सक, यांचे सोबत नियमित संवाद साधून योजनेला आवश्यक बाबींचा पाठपुरावा करावा.

१३. जिल्हा नोडल संस्था यांच्या माध्यमातून जिल्हास्तरीय देखरेख व नियोजन समिती सभांना उपस्थित राहून सभेमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयांवर कार्यवाही प्रस्तवित होणेसाठी मार्गदर्शन करावे.

१४. राज्य संसाधन गटाच्या सदस्यांना जिल्हास्तरावर भेटी देणे आवश्यक असल्याने जिल्हाभेटी दरम्यान सदस्यांना राज्यस्तरावरुन ओळखपत्र, समितीमध्ये अशासकिय सदस्य म्हणून नियुक्तीचे पत्र देण्यात येईल.

१५. राज्य संसाधन गटाच्या सदस्यांचे सदस्यत्व ३ वर्षासाठी कार्यरत राहील. ३ वर्षांनंतर या सदस्यांचे सदस्त्व त्यांच्या कामगिरीनुसार पुन्हा कार्यान्वित करण्याचे अधिकार राज्य सुकाणु समितीस राहील.

१६. ३ वर्षाच्या कालावधीत काही कारणास्तव अशासकिय पद रिक्त झाले असल्यास राज्य सुकाणु समितीमध्ये ठराव घेऊन ते पद भरण्यात येईल.

१७. राज्य संसाधन गटाच्या सदस्यांना जिल्हास्तरीय भेटीसाठी प्रवास खर्च व दैनिक भत्ता राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या वित्तीय मार्गदर्शक सुचनांनुसार राज्य नोडल संस्था स्तरावरुन अदा करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२११०१२१३३००३९११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SOMNATH VASANT POTARE

Digitally signed by SOMNATH VASANT POTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, pseudonym=2F7DD6849F376E58DE2CF34A8700B81E11CB58E0, serialNumber=17E9C3C1EF20B007FEFC5A1F1EC0E69F061648D4F897D5822E9F0E56899502E0, cn=SOMNATH VASANT POTARE
Date: 2021.11.01 17:37:25 +05'30'

**( सोमनाथ पोटरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
७. अतिरिक्त संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
८. कार्यकारी संचालक, राज्य आरोग्य यंत्रणा संसाधन केंद्र, पुणे
९. सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
१०. निवडनस्ती ( आरोग्य -७) .